अति-महत्वाच्या / महत्वाच्या व्यक्तींच्या / अधिका-यांच्या वाहनांवर लाल /अंबर दिवा अनुज्ञेय करण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**

शासन निर्णय क्रमांक एमव्हीआर ०८१०/प्र.क्र. ५१५/परि-२
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक :- १७ सप्टेंबर, २०१०.

वाचा :- १) शासन निर्णय क्र.एमव्हीआर १३९७ / ९९५ /सीआर ३७/ परि-२ ,
दिनांक ०३ जुलै, १९९७
२) शासन परिपत्रक क्र.एमव्हीआर १३९७ / ९९५ / सीआर ३७ / परि-२,
दिनांक ११ फेब्रुवारी, १९९८

**प्रस्तावना :-** महत्वाच्या / अति महत्वाच्या व्यक्ती व अधिका-यांच्या शासकीय वाहनावर लाल / अंबर दिवा लावण्यास अनुज्ञेयता यादी संदर्भाधीन शासन निर्णय दि. ०३, जुलै, १९९७ अन्वये निश्चित करण्यात आली आहे. तसेच सदर सुविधेचा वापर योग्य प्रमाणे होण्यास्तव शासकीय वाहनांना स्टीकर्स लावण्याबाबत दि.०३.०७.१९९७ च्या शासन निर्णयातील परिच्छेद ४ व ५ अन्वये विहीत केलेल्या कार्यपद्धतीची काटेकोरपणे अंमलबजावणी करण्याबाबत शासन परिपत्रक दि. ११ फेब्रुवारी, १९९८ अन्वये सूचना निर्गमित करण्यात आलेले आहेत. लाल अंबर दिवा वाहनावर बसविण्याकरिता विविध अधिकारी, पदाधिकारी, केंद्र शासनाचे अधिकारी यांचेकडून सातत्याने शासनास विनंती करण्यात येत आहे. समाज विध्वंशक घटकाकडून अतिरेकी / दहशतवादी कृत्यासाठी लाल / अंबर दिवाव्याचा गैरवापर करण्याची शक्यता नाकारता येत नाही. या सुविधेचा गैरवापर टाळण्यासाठी / या विषयाचे गांभीर्य व अनन्य साधारण महत्व टिकवून ठेवण्याच्या उद्देशाने सध्या अनुज्ञेय लाल अंबर दिवा सुविधेचा आढावा घेऊन नव्याने ही सुविधा अनुज्ञेय करण्याकरिता गठीत केलेल्या समितीने शासनास केलेल्या शिफारशीस शासन मान्यता प्राप्त झाल्याने संदर्भाधीन शासन आदेशासह वाहन अनुज्ञयेबाबत निर्गमित केलेले स्वतंत्र आदेश अधिक्रमीत करून सुधारित अनुज्ञयतेबाबतचे आदेश निर्गमित करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-** दिव्याची सुविधा नव्याने अनुज्ञेय करण्याबाबत समितीने दि.१६.०८.२०१० रोजी अप्पर मुख्य सचिव (गृह) यांच्या अध्यक्षतेखाली आयोजित केलेल्या बैठकी अन्वये केलेल्या

शिफारशीस अनुसरून खालीलप्रमाणे लाल/ अंबर दिवा अनुज्ञेय करण्याबाबत याद्वारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

| वाहनावरील लाल दिवा सुविधा | |
|---|---|
| १ | राज्यपाल |
| २ | मुख्यमंत्री |
| ३ | उप मुख्यमंत्री |
| ४ | मुंबई उच्च न्यायालयाचे मुख्य न्यायाधीश |
| ५ | सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद |
| ६ | अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा |
| ७ | विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा |
| ८ | विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानपरिषद |
| ९ | सर्व मंत्री |
| १० | मुंबई उच्च न्यायालयाचे सर्व न्यायाधीश |
| ११ | उप सभापती , महाराष्ट्र विधानपरिषद |
| १२ | उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा |
| १३ | सर्व राज्यमंत्री |
| १४ | सर्व उपमंत्री |
| १५ | मुख्य सचिव |
| १६ | अपर मुख्य सचिव |
| १७ | शासनाचे प्रधान सचिव |
| १८ | शासनाचे सचिव |
| १९ | महाधिवक्ता, मुंबई उच्च न्यायालय |
| २० | लोक आयुक्त , महाराष्ट्र राज्य |
| २१ | उपलोक आयुक्त, महाराष्ट्र राज्य |
| २२ | अध्यक्ष , सर्व वैधानिक विकास मंडळ |
| २३ | आयुक्त, मुंबई महानगरपालिका |
| २४ | सर्व जिल्हापरिषदेचे अध्यक्ष ( वापर त्यांच्या अधिकार क्षेत्रापुरताच) |
| २५ | महानगरपालिकेचे महापौर ( वापर त्यांच्या अधिकार क्षेत्रापुरताच) |
| २६ | मुंबईचे नगरपाल ( वापर मुंबई शहरापुरताच ) |
| २७ | पोलीस महासंचालक व महासंचालक दर्जाचे अधिकारी |
| २८ | अप्पर पोलीस महासंचालक दर्जाचे अधिकारी |
| २९ | मुख्य निवडणूक अधिकारी, महाराष्ट्र राज्य |
| ३० | विविध महामंडळावरील अध्यक्ष (मंत्री /राज्यमंत्री पदाचा दर्जा देण्यात आलेले) |
| ३१ | मुख्य माहिती आयुक्त |
| ३२ | राज्य निवडणूक आयुक्त |

| | |
|---|---|
| ३३ | अध्यक्ष, महाराष्ट्र लोकसेवा आयोग |
| ३४ | शासकीय परिवहन सेवेत असलेल्या डी.व्ही. वाहनांचा तसेच जिल्हास्तरावर राज्य अतिथींच्या परिवहन व्यवस्थेकरिता जिल्हाधिकारी यांच्या अधिनस्त उपलब्ध करुन देण्यांत आलेली वाहने. |

| वाहनावरील अंबर दिवा सुविधा | |
|---|---|
| १ | सर्व विभागीय आयुक्त |
| २ | सर्व जिल्हाधिकारी तथा जिल्हा दंडाधिकारी / जिल्हा स्तरावरील अतिरीक्त जिल्हाधिकारी |
| ३ | सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद |
| ४ | पोलीस आयुक्त ( अप्पर पोलीस महासंचालक दर्जा वगळुन) |
| ५ | सर्व पोलीस अधिक्षक |
| ६ | आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क |
| ७ | विक्रीकर आयुक्त |
| ८ | परिवहन आयुक्त |
| ९ | महाव्यवस्थापक, बेस्ट उपक्रम, मुंबई |
| १० | सर्व "ब आणि क " दर्जा असलेले महानगरपालिका आयुक्त |
| ११ | महानिरीक्षक (तुरुंग) |
| १२ | अतिरिक्त आयुक्त महानगरपालिका ("अ " दर्जा प्राप्त महानगरपालिका) |
| १३ | प्रधान मुख्य वनसंरक्षक |
| १४ | महाराष्ट्र शासनाच्या अधिनियमाद्वारे स्थापन झालेल्या सर्व विद्यापीठांचे कुलगुरु |
| १५ | उपविभागीय दंडाधिकारी |
| १६ | तालुका दंडाधिकारी |
| १७ | परिक्षेत्र विशेष पोलीस महानिरिक्षक |
| १८ | पोलीस उप महानिरिक्षक, गडचिरोली परिक्षेत्र |
| १९ | सह पोलीस आयुक्त (पोलीस आयुक्त कार्यालय ) |
| २० | अप्पर पोलीस आयुक्त, (वाहतूक ) |
| २१ | महानगरपालिका/महापालिका/नगरपालिका/नागरी संरक्षण दलाच्या अधिपत्या- -खालील राज्य फिरते आणीबाणी सेना स्थंब दलातील अग्नीक्षमन वाहने |
| २२ | पोलीस दलाची वाहने |
| २३ | परिवहन विभागातील वायुवेग पथक / विशेष मोहीमेतंर्गत तपासणी /अंमलबजावणी करण्यासाठी वापरली जाणारी वाहने |
| २४ | मुंबईस्थित असलेल्या राजशिष्टाचार विभागाच्या वाहनांवर (सह सचिव व सह मुराअ, उप सचिव (राजशिष्टाचार) तसेच विमान तळावरील विशेष राजशिष्टाचार अधिकारी |
| २५ | परिवहन विभाग, राज्य उत्पादन शुल्क व पर्यावरण नियंत्रण मंडळ तसेच विक्रीकर विभागातील अंमलबजावणी करणारी शासकीय वाहने |
| २६ | विविध महामंडळावरील कार्यरत सचिव दर्जाचे नियुक्त अधिकारी |

| | |
|---|---|
| २७ | अतिक्रमण निष्कासन अधिकारी (मुंबई / मुंबई उपनगरे ) |
| २८ | अतिरिक्त जिल्हा दंडाधिकारी |
| २९ | प्रधान जिल्हा व सत्र न्यायाधीश |

२. केंद्रीय मोटार वाहन नियम , १९८९ च्या नियम १०८ मधील तरतुदीनुसार राज्य शासनास अतिमहत्वाच्या व्यक्तीच्या / अधिका-याच्या दर्जेच्या अनुषंगाने शासकीय वाहनावर लाल दिवा व अधिका-यांच्या कामकाजाशी निगडीत अंबर दिवा लावण्यास परवानगी देण्याचे अधिकार आहेत. केंद्र शासनाच्या अधिका-यांना दिव्याची सुविधा अनुज्ञेय करण्याचे अधिकार केंद्र शासनास असल्याने राज्य शासनाच्या स्तरावर त्यांचा विचार केला जाणार नाही.

३. हे आदेश निर्गमित झाल्याने, यापूर्वी दिवा अनुज्ञेयतेबाबत निर्गमित केलेले सर्व आदेश अधिक्रमीत होणार आहेत.

४. अतिमहत्वाच्या वक्ती / अधिका-यांच्या शासकीय वाहना व्यतिरीक्त इतर कोणाही व्यक्तींना वाहनांवर लाल / अंबर दिवा बसविण्याची परवानगी नाही, अशा कोणत्याही व्यक्तींनी त्यांच्या वाहनांवर लाल / अंबर दिवा बसविला असल्यास तो त्वरीत काढण्यात यावा. अन्यथा मोटार वाहन कायदा व त्याखालील नियमांच्या उल्लंघनाबाबत ते कार्यवाहीसाठी पात्र राहतील. **याबाबतची सर्वस्वी जबाबदारी संबंधित अधिका-यासह वाहन चालकाची राहील. याची कृपया नोंद घ्यावी.**

५. लाल / अंबर दिवा अनुज्ञेय आहे अशा व्यक्ती वाहनात उपस्थित नसतील त्यावेळी दिवा कव्हरने झाकून ठेवण्याबाबत **संबंधित वाहन चालकाने दक्षता घ्यावी.**

६. दिव्याच्या सुविधेचा गैरवापर टाळण्याच्या दृष्टीने असा दिवा अनुज्ञेय असलेल्या शासकीय वाहनांना परिवहन विभागाकडून **स्टिकर** देण्यात यावे. स्टीकरवर वाहन क्रमांक , अतिमहत्वाच्या व्यक्तीचे / अधिका-याचे पदनाम व स्टिकर नंबर नोंदविला असेल. संबंधितांनी प्रस्तुत आदेश निर्गमित झाल्याच्या १ महिन्याच्या आत स्टिकर मिळण्यासाठी परिवहन आयुक्त यांचे कार्यालय, ३ व ४ था मजला, प्रशासकीय इमारत, सरकारी वसाहत, वांद्रे (पुर्व) , मुंबई ४०० ०५१ यांच्याशी संपर्क साधावा. स्टिकर्स नसलेली परंतू लाल / अंबर दिवा असलेल्या वाहनांवरील दिवे अनधिकृत समजण्यात येवून अशी वाहने मोटार वाहन विभाग व पोलीस विभागाद्वारे कारवाई करण्यास पात्र ठरतील.

७. लाल / अंबर दिव्याची सुविधा ही त्या पदावर कार्यरत व्यक्तींसाठी असून त्याच्याशी समकक्ष असणा-या पदावरील दुस-या व्यक्तीला अनुज्ञेय असणार नाही.

८. लाल / अंबर दिव्याची ही सुविधा फक्त एका शासकीय वाहनासाठी किंवा शासकीय वाहन उपलब्ध /अनुज्ञेय नसेल तर संबंधीत पदावरील व्यक्तीच्या वैयक्तीक वापराखालील खाजगी वाहनासाठी अनुज्ञेय राहील.

९. ज्या अतिमहत्वाच्या व्यक्ती/ अधिकारी यांना ही सुविधा अनुज्ञेय केली आहे त्यांना परिवहन आयुक्त / प्रादेशिक परिवहन अधिकारी यांनी ही सुविधा अनुज्ञेय केलेल्या वाहनांना स्टीकर देण्याची कार्यवाही करावी.

१०. वरीलप्रमाणे आदेश निर्गमित झाल्यानंतर, मंत्रालयीन सर्व प्रशासकीय विभागास आदेशाची प्रत देण्यात यावी. सदर विभागाने त्यांच्या अधिपत्याखालील विभाग प्रमुख, महामंडळे इ. वर दिवा अनुज्ञेय नसल्यास, न वापरण्याबाबत आदेश निर्गमित करावेत.

११. परिवहन आयुक्त यांनी आढावा घेऊन, अनुज्ञेयता नसलेल्या अधिका-यांना दिवा वापरण्यास बंदी करण्यास मोहिम आखून प्रत्येक महिन्याच्या शेवटच्या आठवड्यात शासनास अभिप्रायासह अहवाल सादर करावा.

१२. अनधिकृतरीत्या व विनापरवाना शासकीय वाहनावर दिव्यासह **सायरन** बसविण्यात येत असल्याने मोटार वाहन अधिनियम व ध्वनी प्रदुषण अधिनियमातील तरतूदींचा भंग होत असल्याबाबत ब-याच सामाजिक संघटनाकडून शासनास तक्रारी प्राप्त होत असल्याने यानुषंगाने परिवहन आयुक्तानी अधिनियम / नियमातील तरतूदी विचारात घेऊन सायरन आवाज क्षमतेच्या मर्यादेबाबत आवश्यक ते आदेश तात्काळ निर्गमित करण्यात यावेत.

१३. अंबर दिव्याच्या यादीतील **अ.क्र. २५ मधील नमुद अंमलबजावणी करणा-या शासकीय वाहनांवर** प्रत्यक्षात अंमलबजावणी करतानांच अशा वाहनांवर अंबर दिवा लावण्याची दक्षता संबंधित अधिका-यांनी घ्यावी.

१४. हा शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या (www.maharashtra.gov.in) या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेताक २०१००९१८१४३३४१००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**( चिं. शा. संगीतराव )**
सचिव (परिवहन), गृह विभाग, महाराष्ट्र शासन

प्रति,

मा.राज्यपाल यांचे खाजगी सचिव
मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव
मा.उप मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव
सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव
सर्व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
मा.मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक
सर्व अप्पर मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक
प्रधान सचिव ( राजशिष्टाचार )
सर्व प्रधान सचिव / सचिव यांचे स्वीय सहाय्यक

मा.महाधिवक्ता, मुंबई उच्च न्यायालय
निबंधक मा.मुंबई उच्च न्यायालय
मा.लोक आयुक्त यांचे कार्यालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
अध्यक्ष , सर्व वैधानिक विकास मंडळ
आयुक्त, मुंबई महानगरपालिका
सर्व जिल्हापरिषदेचे अध्यक्ष
सर्व महानगरपालिकेचे महापौर
मुंबईचे नगरपाल
पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
मुख्य निवडणूक अधिकारी, महाराष्ट्र राज्य, मुंबई
मुख्य माहिती आयुक्त
राज्य निवडणूक आयुक्त
अध्यक्ष, महाराष्ट्र लोकसेवा आयोग
सर्व विभागीय आयुक्त
सर्व जिल्हाधिकारी
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
सर्व पोलीस आयुक्त ( अप्पर पोलीस महासंचालक दर्जा वगळुन)
सर्व पोलीस अधिक्षक
आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क
विक्रीकर आयुक्त
परिवहन आयुक्त
महाव्यवस्थापक, बेस्ट उपक्रम, मुंबई
सर्व "ब आणि क " दर्जा असलेले महानगरपालिका आयुक्त
महानिरीक्षक (तुरुंग)
अतिरिक्त आयुक्त महानगरपालिका ("अ " दर्जा प्राप्त महानगरपालिका)
प्रधान मुख्य वनसंरक्षक
पोलीस उप महानिरिक्षक, गडचिरोली परिक्षेत्र
अप्पर पोलीस आयुक्त, (वाहतूक ), मुंबई
सर्व प्रधान जिल्हा न्यायाधिश
सर्व मंत्रालयीन विभाग
निवड नस्ती (परिवहन - 2)